**पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाच्या (खुद्द) आस्थापनेवरील २५ अस्थायी पदांना दिनांक ०१ मार्च, २०२२ ते दिनांक ३१ ऑगस्ट, २०२२ पर्यंत मुदतवाढ देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः** आस्था २०१६/प्र.क्र. १०९/पापु-०१
गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत, ७ वा मजला, क्रॉफर्ड मार्केट जवळ,
लोकमान्य टिळक मार्ग, मंत्रालय, मुंबई- ४०० ००१.
दिनांक: ०२ मार्च, २०२२.

**वाचा :-**

१) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांक आढावा १००१/प्र.क्र. ६२८/पापु-०१, दिनांक ४ सप्टेंबर, २००२.
२) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांक आस्था २०१६/प्र.क्र. १०९/पापु-०१, दिनांक १६ सप्टेंबर, २०२०
३) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक पदनि २०१६/प्र.क्र. ८/१६/आ.पु.क., दिनांक १५ फेब्रुवारी, २०२१.
४) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांक आस्था २०१६/प्र.क्र. १०९/पापु-०१, दिनांक २३ फेब्रुवारी, २०२१.
५) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक पदनि २०१६/प्र.क्र. ८/१६/आ.पु.क., दिनांक १० ऑगस्ट, २०२१.
६) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांक आस्था २०१६/प्र.क्र. १०९/पापु-०१, दिनांक ३० ऑगस्ट, २०२१.
७) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक पदनि २०१६/प्र.क्र. ८/१६/आ.पु.क., दिनांक २२ फेब्रुवारी, २०२२.

**प्रस्तावना :-**

पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाच्या उक्त वाचा क्रमांक १ येथील दिनांक ४ सप्टेंबर, २००२ रोजीच्या शासन निर्णयान्वये पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातील (खुद्द) पदांबाबतच्या आढाव्यानुसार विभागाच्या आकृतीबंधात समाविष्ट असणाऱ्या २५ अस्थायी पदांना उक्त वाचा क्रमांक २ येथील दिनांक १६ सप्टेंबर, २०२० व वाचा क्रमांक ४ येथील दिनांक २३ फेब्रुवारी, २०२१ रोजीच्या

शासन निर्णयान्वये १ सप्टेंबर, २०२० ते दिनांक ३१ ऑगस्ट, २०२१ तसेच, वाचा क्र.६ येथील दिनांक ३० ऑगस्ट, २०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये १ सप्टेंबर, २०२१ ते दिनांक २८ फेब्रुवारी, २०२२ पर्यंत मुदतवाढ पुढे चालू ठेवण्यास मंजुरी देण्यात आलेली आहे.

०२. उक्त वाचा क्रमांक ७ येथील वित्त विभागाच्या दिनांक २२ फेब्रुवारी, २०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये सर्व प्रशासकीय विभागांना त्यांच्या आकृतीबंधात समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना तसेच यापुर्वी आढावा मंजुर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतु ज्यांचा आकृतीबंधात समावेश करण्यात आलेला नाही अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना दिनांक ०१ मार्च, २०२२ ते दिनांक ३१ ऑगस्ट, २०२२ पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार देण्यात आलेले आहेत. त्यानुषंगाने पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाच्या (खुद्द) आस्थापनेवरील २५ अस्थायी पदांना पुढे चालू ठेवण्यास मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. ही बाब विचारात घेऊन, शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

## शासन निर्णय:-

केंद्र शासन व राज्य शासनाच्या धोरणानुसार पाणी पुरवठा व स्वच्छता विभागामार्फत पिण्याचे शुध्द व पुरेसे पाणी आणि स्वच्छतेच्या सुविधा उपलब्ध करावयाच्या अनुषंगाने योजनांची अंमलबजावणी करण्यासाठी विभागाला अधिक मनुष्यबळाची आवश्यकता निर्माण झाली आहे. यास्तव पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाच्या (खुद्द) आस्थापनेवरील २५ अस्थायी पदे पुढे चालू ठेवणे आवश्यक आहे.

०२. सबब, उपरोक्त वाचा क्रमांक ७ येथील वित्त विभागाच्या दिनांक २२ फेब्रुवारी, २०२२ रोजीच्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार या शासन निर्णयासोबत जोडलेल्या प्रपत्र अ मध्ये दर्शविण्यात आलेल्या पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाच्या (खुद्द) आस्थापनेवरील २५ अस्थायी पदांना दिनांक ०१ मार्च, २०२२ ते दिनांक ३१ ऑगस्ट, २०२२ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास शासन मंजुरी देण्यात येत आहे.

०३. यावर होणारा खर्च मागणी क्रमांक वाय-५, लेखाशिर्ष-३४५१-सेक्रेटरीएट आर्थिक सेवा-०९०-सेक्रेटरीएट (१) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग (३४५१ ०४६७) या लेखाशिर्षाखाली सन २०२२-२०२३ या वित्तीय वर्षाच्या मंजुर तरतुदीतून भागविण्यात यावा.

०४. सदर शासन निर्णय हा वित्त विभागाच्या दिनांक २२ फेब्रुवारी, २०२२ रोजीच्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

**०५.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०३०२११४११३१४२८ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने.

RAVINDRA GORAKH BHARATE

Digitally signed by RAVINDRA GORAKH BHARATE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=96ee74617e9bb0cdcfad343ca5dc2e158423ad4dd919bcae9a0b9fc9b413b60b, pseudonym=70D3D439CAAEA9606F4BC7818EBB80F4CAED8330, serialNumber=FD232EB47EB633CB760C7BD2ACF421B01B1DA040DC965254760018B5F4E33BE5, cn=RAVINDRA GORAKH BHARATE
Date: 2022.03.02 16:14:23 +05'30'

**( डॉ. रविंद्र भराटे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

प्रत :-

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
३. निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
४. उप सचिव, वित्त विभाग (आ.पु.क.), मंत्रालय, मुंबई.
५. अवर सचिव (रोखशाखा), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग.
६. अवर सचिव / कार्यासन अधिकारी (पापु-०४), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग.
७. निवडनस्ती (पापु-०१)

**प्रपत्र - अ**

शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांक आस्था २०१६/प्र.क्र. १०९/पापु-०१,
दिनांक : ०२ मार्च, २०२२ चे सहपत्र.
पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाच्या (खुद्द) आस्थापनेवरील अस्थायी पदे.

| अ.क्र. | पदनाम | वेतन बँड + ग्रेड पे | पदसंख्या |
|---|---|---|---|
| १ | उप सचिव | रु. १५६००-३९१०० + ७६०० | १ |
| २ | अवर सचिव | रु. १५६००-३९१०० + ७६०० | २ |
| ३ | कक्ष अधिकारी | रु. ९३००-३४८०० + ४८०० | ३ |
| ४ | सांख्यिकी अधिकारी | रु. ९३००-३४८०० + ४४०० | १ |
| ५ | लेखा अधिकारी | रु. ९३००-३४८०० + ४४०० | १ |
| ६ | उप अभियंता | रु. १५६००-३९१०० + ५४०० | ३ |
| ७ | उच्चश्रेणी लघुलेखक | रु. ९३००-३४८०० + ४४०० | १ |
| ८ | निम्नश्रेणी लघुलेखक | रु. ९३००-३४८०० + ४३०० | ३ |
| ९ | लघुटंकलेखक | रु. ५२००-२०२०० + २२०० | २ |
| १० | सहायक कक्ष अधिकारी | रु. ९३००-३४८०० + ४३०० | ४ |
| ११ | लिपिक-टंकलेखक | रु. ५२००-२०२०० + १९०० | ४ |
| | **एकुण पदे** | | **२५** |

RAVINDRA GORAKH BHARATE

Digitally signed by RAVINDRA GORAKH BHARATE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=96ee74617e9bb0cdcfad343ca5dc2e158423ad4dd919bcae9a0b9fc9b413b60b, pseudonym=70D3D439CAAEA9606F4BC7818EBB80F4CAED8330, serialNumber=FD232EB47EB633CB760C7BD2ACF421B01B1DA040DC965254760018B5F4E33BE5, cn=RAVINDRA GORAKH BHARATE
Date: 2022.03.02 16:16:23 +05'30'

( डॉ. रविंद्र भराटे )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.